**राज्यातील विविध पोलीस घटकांच्या आस्थापनेवर सन १९९३ पूर्वी पोलीस शिपाई पदावर नियुक्त झालेल्या कर्मचाऱ्यांना संगणक अर्हता प्रमाणपत्र सादर करण्यापासून सूट देण्याबाबत......**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: पोलीस १८१९/प्र.क्र.१९१/पोल-५अ,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १३ फेब्रुवारी, २०२०.

वाचा :- १) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्र.सेप्रनि १०९८/प्र.क्र.७/९८/१२, दि.२५/०१/१९९९.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, प्रशिक्षण-२०००/प्र.क्र. ६१/२००१/३९, दि. ०७/०८/२००१.
३) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे पत्र क्र.CP/D.२(७)/O&M/PKJ/७४/२०१९, दि.२५/०६/२०१९.

प्रस्तावना :-

सामान्य प्रशासन विभाग अधिसुचना क्र. सेप्रनि १०९८/प्र.क्र.७/९८/१२, दि.२५/०१/१९९९ अन्वये "महाराष्ट्र नागरी सेवा (संगणक हाताळणी / वापराबाबतचे ज्ञान आवश्यक ठरविण्याबाबत) नियम, १९९९" अधिसुचित करण्यात आलेले आहेत. सामान्य प्रशासन विभाग यांच्या दि. ०३/०५/२००० च्या अधिसुचनेद्वारे वरील विनियमांना दि. ०१/०१/२००१ पासून प्रभाव देण्यात आलेला आहे. सदर नियमातील तरतुदीनुसार शासनाच्या विभाग / कार्यालयातील गट-अ, गट-ब व गट-क मधील पदावर शासन सेवेत असलेल्या अधिकारी कर्मचाऱ्यांना विहित कालावधीत संगणक हाताळणी / वापराबाबतचे ज्ञान असल्याबाबत प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक आहे.

राज्याच्या पोलीस दलातील "पोलीस शिपाई" या पदाची शैक्षणिक अर्हता सन १९९३ पर्यंत ८ वी पास अशी होती. दि. २५/११/१९९३ च्या शासन निर्णयान्वये सदर शैक्षणिक अर्हतेमध्ये वाढ करण्यात आली असून ती माध्यमिक शालांत परीक्षा अशी करण्यात आली आहे. त्यामुळे सन १९९३ पुर्वी नियुक्ती झालेल्या पोलीस शिपाई कर्मचाऱ्यांची शैक्षणिक अर्हता ८ वी पास अशी असल्याने ते महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळामार्फत घेतल्या जाणाऱ्या संगणक अर्हता परीक्षेसाठी बसू शकले नाहीत. सबब या कर्मचाऱ्यांना संगणक अर्हता परीक्षा उत्तीर्ण झाल्याची प्रमाणपत्रे सादर करता आलेली नाहीत.

शासन निर्णय, वित्त विभाग दि. ३१/०१/२०१९ च्या शासन निर्णयान्वये शासकिय कर्मचाऱ्यांना ७ वा वेतन आयोग दि. ०१/०१/२०१६ पासून लागू करण्यात आला आहे. बृहन्मुंबई पोलीस दलातील जवळपास ४५०० कर्मचारी सेवानिवृत्त झाले असून संगणक अर्हता प्रमाणपत्रा अभावी या कर्मचाऱ्यांची ७ व्या वेतन आयोगानुसार वेतन निश्चिती करता आलेली नाही. या पार्श्वभुमीवर दि. ३०/११/१९९३ पुर्वी ज्या

कर्मचाऱ्यांची पोलीस शिपाई पदावर नियुक्ती झाली आहे, अशा पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या अधिपत्याखालील अंमलदारांना संगणक अर्हता परीक्षा उत्तीर्ण प्रमाणपत्र सादर करण्यापासून सूट देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता .

**शासन निर्णय :-**

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या अधिपत्याखालील सन १९९३ पूर्वी पोलीस शिपाई या पदावर नियुक्ती झालेल्या विविध संवर्गातील पुढीलप्रमाणे १३,९०९ अंमलदारांना महाराष्ट्र नागरी सेवा (संगणक हाताळणी बाबतचे ज्ञान आवश्यक ठरविण्याबाबत) नियम, १९९९ मधील नियम ६ नुसार संगणक अर्हता प्रमाणपत्र सादर करण्यास सूट देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे :-

| अ.क्र. | पदनाम | संख्या |
|---|---|---|
| १ | सहायक पोलीस उपनिरीक्षक | १२४५ |
| २ | पोलीस हवालदार लेखनिक | ४४१ |
| ३ | पोलीस हवालदार | ६४०७ |
| ४ | पोलीस नाईक | २२१५ |
| ५ | पोलीस शिपाई | १०९ |
| ६ | सेवानिवृत्त / स्वेच्छासेवानिवृत्त / दिवंगत पोलीस कर्मचारी | ३४९२ |
| | एकूण | १३९०९ |

हे आदेश सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१३९/२०२०/कार्या-१२, दि. ११/०२२०/२० अन्वये मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२१३१२२१५५७२२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Venkatesh Madhav Bhat

Digitally signed by Venkatesh Madhav Bhat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5f0272b97156a5d2812bad6725ca46fb2671d1da082 08cfdd6677fac0afd6bf2, cn=Venkatesh Madhav Bhat
Date: 2020.02.13 12:24:53 +05'30'

**( व्यं. मा. भट )**
उप सचिव, गृह विभाग

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.

४. अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. निवडनस्ती (पोल-५अ).